**महाराष्ट्र शासन**
**क्र. सगृयो-२००१/प्र.क्र. १८८/१४-स**
**सहकार व वस्त्रोद्योग विभाग**
**मंत्रालय, मुंबई-३२**
**दिनांक: ९ ऑगस्ट, २००१**

**वाचा :** सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्रमांक गृहनिर्माण/ गाळा तबदील/फी/८९ दिनांक २७/११/१९८९ चे परिपत्रक.

ज्या अर्थी, सहकारी गृहनिर्माण संस्थांसाठी तयार केलेल्या नमुनेदार उपविधींना सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दि. २/७/२००१ रोजी मान्यता दिली असून हया नमुनेदार उपविधीमधील उपविधी क्र. ३८(ई) ९ मध्ये नमुद केल्यानुसार, सहकारी गृहनिर्माण संस्थेमधील सदनिका/ गाळा हस्तांतरित (तबदील) करताना आकारावयाच्या प्रिमीयमचे कमाल दर ठरविण्याचे अधिकार राज्य शासनाच्या सहकार व वस्त्रोद्योग विभागाला दिलेले आहेत; आणि

ज्या अर्थी, सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या परिपत्रक क्र. गृहनिर्माण/ गाळा तबदील/फी/८९ दि. २७/११/१९८९ अन्वये प्रिमीयमचे दर निश्चित केलेले असून सद्य:स्थितीत प्रस्तुत परिपत्रक रद्द करुन राज्यशासनाने त्याबाबतचे आदेश प्रस्तुत करणे अगत्याचे झालेले असल्याने सहकारी गृहनिर्माण संस्थेमधील सदनिका/गाळा हस्तांतरीत (तबदील) करताना आकारावयाच्या प्रिमीयमसंबंधी योग्य ते आदेश काढण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे, त्या अर्थी

**आदेश**

महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६०, कलम ७९-अ अन्वये राज्य शासनास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन राज्यातील जनतेच्या व्यापक जनहितार्थ पुढीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत.

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे परिपत्रक क्र. गृहनिर्माण/गाळा तबदील/ फी/८९, दि. २७/११/१९८९ रद्द करण्यात येत आहे.

२) सभासदाची सहकारी गृह निर्माण संस्थेमधील सदनिका/ गाळा आणि त्याचे संस्थेच्या भागभांडवल/ मालमत्तेमधील भाग व हक्क दुस-याकडे हस्तांतरित (तबदील) करताना आकारावयाच्या प्रिमियमचा दर संस्थेच्या सर्वसाधारण सभेमध्ये निश्चित करावेत.

मात्र संस्थेच्या सर्वसाधारण सभेने ठरविलेले प्रिमियमचे दर कोणत्याही परिस्थितीत खाली दर्शविण्यात आलेल्या कमाल दरा-पेक्षा जास्त असू नयेत.

| विभाग | आकारावयाचा प्रिमियमचा दर (रुपये) |
|---|---|
| १) महानगर पालिका व प्राधिकरण क्षेत्र | २५,००० /- |
| २) "अ" वर्ग नगर पालिका | २०,००० /- |
| ३) "ब" वर्ग नगर पालिका | १५,००० /- |
| ४) "क" वर्ग नगर पालिका | १०,००० /- |
| ५) ग्रामपंचयती (ग्रामीण क्षेत्र) | ५,००० /- |

सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( वसंत पोरेड्डीवार)
उप सचिव, महाराष्ट्र शासन
सहकार व वस्त्रोद्योग विभाग

प्रति,

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, (सर्व)
३) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)

४) उपनिबंधक, सहकारी संस्था (म्हाडा),गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई- ४३० ५१.

५) सहाय्यक निबंधक, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण गृहनिर्माण भवन, ५ वा मजला, वांद्रे (पूर्व),मुंबई-५१.

६) अध्यक्ष, जिल्हा गृहनिर्माण संस्थांचे फेडरेशन (सर्व जिल्हे)

व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय,चर्नी रोड, मुंबई

त्यांना विनंती करण्यात येते की, सदर आदेश शासन राजपत्र, असाधारण भाग-४ ब दिनांक ९ ऑगस्ट, २००१ मध्ये प्रकाशित करुन त्याच्या १०० प्रती या विभागाला पाठवाव्यात.

( वसंत पोरेड्डीवार)
उप सचिव, महाराष्ट्र शासन
सहकार व वस्त्रोद्योग विभाग